## देशातील पहिल्या वैद्यकीय पार्कला मंजूरी

०१. महागडी वैद्यकीय उपकरणे अतिशय कमी किमतीत देशांमध्येच तयार करण्याच्या उद्देशाने केंद्र सरकारने सार्वजनिक उपक्रम एचएलएल लाइफ केअरला चेन्नईमध्ये ३०० एकर जमीन भाडेतत्त्वावर देण्यास मंजुरी दिली आहे. या जमिनीवर देशातील पहिले वैद्यकीय उत्पादन निर्मिती करणारे पार्क साकारणार आहे.

०२. केंद्रीय मंत्रिमंडळाच्या बैठकीत आरोग्य मंत्रालयाच्या अंतर्गत येणाऱ्या या सार्वजनिक उपक्रमाला चेन्नईजवळ असणाऱ्या चेंगालपट्टमध्ये ३१०.१० एकर जमीन भाडेतत्त्वावर देण्यास मंजुरी देण्यात आली आहे. यामध्ये वैद्यकीय पार्क तयार करण्यात येणार असून, यामध्ये एचएलएलची ५० टक्के भागीदारी असणार आहे.

०३. वैद्यकीय प्रकल्प देशाच्या वैद्यकीय तंत्रज्ञान क्षेत्रामध्ये पहिलाच उत्पादन प्रकल्प ठरणार आहे. यामध्ये महागडी वैद्यकीय उत्पादने अतिशय कमी किमतीमध्ये तयार करण्याचा प्रयत्न करण्यात येणार आहे. तसेच हे करत असताना ही उत्पादने परिणामकारक आणि देशातील मोठ्या लोकसंख्येला अतिशय कमी किमतीमध्ये योग्य निदानाची सेवा देण्यास मदत करतील.

## जीसॅट-१८ चे यशस्वी प्रक्षेपण

१. भारताच्या जीसॅट-१८ या उपग्रहाचे गुरूवारी फ्रेंच गयाना येथून अवकाशात यशस्वी प्रक्षेपण करण्यात आले. फ्रान्समधील कौउरो येथून आज उपग्रहाचे यशस्वी उड्डाण करण्यात आले.

०२. भारतीय प्रमाणवेळेनुसार पहाटे २ वाजता एरियनस्पेसच्या एरियन ५ व्हीएन २३१ या प्रक्षेपकाच्या मदतीने जी सॅट-१८ चे प्रक्षेपण पार पडले. याच्याबरोबर ऑस्ट्रेलियाचा मस्टर-२ हा उपग्रहही अवकाशात सोडण्यात आला.

०३. जीसॅट हा उपग्रह सी बँड व केयू बँड सेवांचा विस्तार करण्यासाठी सोडण्यात येत असून त्याचे वजन ३४०४ किलो आहे व त्यात ४८ संदेशवहन ट्रान्सपाँडर आहेत. एरियनस्पेससाठी ही २८० वी मोहीम होती.

०४. जी सॅट-१८ इस्रोकडून अवकाशात सोडला गेलेला विसावा उपग्रह आहे. या अत्याधुनिक उपग्रहाचा भारताच्या माहिती दूरसंचार सेवेला उपयोग होणार आहे.

## ताजमहलवर मड थेरेपी करण्यात येणार

०१. ताजमहलचा पिवळा पडलेला मुख्य घुमट चमकवण्यासाठी मड थेरेपी (मातीचा मुलामा) करण्यात येणार आहे. यासाठी सुमारे एक वर्षभर ताजमहल पर्यटकांसाठी बंद करण्याचा निर्णय पुरातत्व विभागाने घेतला आहे.



०२. ताजमहल पर्यटकांसाठी कधीपासून बंद करायचा याचा निर्णय अद्याप झालेला नाही.ताजमहलचा मुख्य घुमटा हा पिवळा पडला आहे. या घुमटाला मातीचा मुलामा देऊन तो पूर्वीसारखाच चमकदार केला जाणार आहे.

०३. या घुमटावर असलेला ९. २९ मीटर उंचींच्या कलशावरही पहिल्यांदाच रासायनिक प्रक्रिया करण्यात येणार आहे. धूळ, पाऊस आणि मातीमुळे या कलशाचा रंग गेला आहे. घुमटावरील पिवळेपणा आणि ब्लॅक कार्बनचे डाग हटवण्यासाठी मातीचा मुलामा गरजेचा असल्याचेही पुरातत्व विभागाकडून सांगण्यात आले.

०४. यापूर्वी १९४२ मध्ये ताजमहलला झाकण्यात आले होते. त्यावेळी पर्यटक बाहेरूनच ताजमहलचे सौंदर्य पाहून जात

०५. ताजमहलवर तिसऱ्यांदा मडपॅक थेरेपीची प्रक्रिया केली जात आहे. एप्रिल २०१५ पासून ही प्रक्रिया सुरु आहे.

०६. मुख्य घुमटावर २ मिमी जाडीचा मातीचा मुलामा लावला जाणार आहे. हा थर सुकल्यानंतर नॉयलॉनच्या ब्रशने बाजूला काढून फिल्टर पाण्याने धुतला जाणार आहे.

०७. मात्र, ही प्रक्रिया ताजमहलसाठी नुकसानकारक आहे, असे मत काही संशोधकांनी व्यक्त केले आहे. तर काहींनी ही प्रक्रिया स्मारकांच्या सफाईसाठी जगातील सर्वात सुरक्षित असल्याचे म्हटले आहे.